ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ च्या तरतूदीनुसार जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, अहमदनगर येथील अध्यक्ष पदावर श्री.विजय चंद्रलाल प्रेमचंदानी यांची पुनर्नियुक्ती करण्याबाबत.

## महाराष्ट्र शासन

**अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग,**
**शासन निर्णय, क्र.नियुक्ती-२०१८/प्र.क्र.१६०/ग्रासं-४**
हुतात्मा राजगुरु चौक,
मादाम कामा मार्ग, मंत्रालय (वि.), मुंबई-३२.
दिनांक:- **११** जानेवारी, २०१९

**वाचा:-** १) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ मधील नियम, २०००
२) राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राआ/महा./आस्था-५/राआ/जिमं-अध्यक्ष/२०१८/७९, दि.१५.१२.२०१८

**शासन निर्णय:-**

ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ च्या तरतूदींनुसार ग्राहकांच्या तक्रारींचे निवारण करण्यासाठी राज्यामध्ये जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाची स्थापना करण्यात आली आहे. सदर अधिनियमाच्या कलम, १० च्या पोटकलम, (३) व कलम ३० चे पोटकलम (२) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच, अहमदनगर येथील अध्यक्ष पदावर श्री.विजय चंद्रलाल प्रेमंचदानी यांची पुनर्नियुक्ती याद्वारे करण्यात येत आहे.

२. सदर विद्यमान अध्यक्षांची पुनर्नियुक्ती त्यांनी विहीत नमून्यातील शपथपत्र व हमीपत्र राज्य आयोगास सादर केल्यानंतर व त्यांनी त्यांच्या पदाचा प्रत्यक्षात पदभार स्वीकारल्यानंतर प्रभावी होईल. सदरील अध्यक्ष पदावरील पुर्ननियुक्ती खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून, करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे :-

**अटी व शर्ती :-**

१) संबंधित उमेदवाराची पुनर्नियुक्ती ही त्यांच्या वैद्यकीय तपासणी व पोलीस पडताळणी अहवालाच्या अधिन राहून करण्यात येत आहे. ज्यांचे पोलीस पडताळणी/वैद्यकीय तपासणी अहवाल प्रतिकुल असल्यास/त्यामध्ये कोणतेही प्रतिकुल शेरे नमूद केले असल्यास त्यांची नियुक्ती रद्द करण्यात येईल.

२) जिल्हा मंचाच्या अध्यक्षाची पुर्ननियुक्ती ५ वर्षासाठी किंवा त्यांच्या वयाची ६५ वर्षे पूर्ण होईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल तो पर्यंत राहील.

३) अधिवक्ता संवर्गातून नामनिर्देशनाने नियुक्त होणाऱ्या जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंचाच्या अध्यक्षांना शासन परिपत्रक क्र.ग्रासंक-२२०९/३४८/प्र.क्र.४३७५/ग्रासं.३, दि.०३ नोव्हेंबर, २०१० अन्वये निश्चित केल्यानुसार वेतन/मानधन अनुज्ञेय राहील.

४) जिल्हा मंचाचे अध्यक्ष जिल्हा मंचाच्या कामासाठी दौऱ्यावर असतांना राज्य शासनाच्या प्रथमश्रेणी अधिकाऱ्यांना अनुज्ञेय दैनिक व प्रवास भत्ता मिळण्यास ते पात्र राहतील. परंतु, त्यांना विमान प्रवास तसेच, वातानुकूलित प्रथम वर्गाचा रेल्वे प्रवास अनुज्ञेय राहणार नाही.

५) जिल्हा ग्राहक मंचाच्या अध्यक्षांच्या सेवाविषयक अन्य बाबी किंवा शर्ती ग्राहक संरक्षण कायदा, १९८६ व नियम, २००० व शासनाने त्यामध्ये वेळोवेळी केलेल्या सुधारणेनुसार नियमित होतील.

६) लोकहितास्तव किंवा प्रशासकीय कारणास्तव जिल्हा ग्राहक मंचाच्या अध्यक्षांच्या सेवा एका जिल्हा मंचातून दुसऱ्या जिल्हा मंचामध्ये बदलीस पात्र असतील किंवा कामाचा भार किंवा प्रलंबित प्रकरणे विचारात घेता, राज्य आयोग ठरविल त्याप्रमाणे दोन जिल्हा मंचांना जोडून त्यांच्या सेवेचा उपयोग करुन घेता येईल.

७) पुनर्नियुक्तीचे आदेश निर्गमित झाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांत संबंधितांनी पदभार न स्वीकारल्यास त्यांची नियुक्ती आपोआप रद्दबातल होईल.

३. उपरोक्त बाबींसाठी होणार खर्च मागणी क्र.एम-२ “२४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) (००) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य ग्राहक संरक्षण परिषद, राज्य आयोग व जिल्हा मंचाची स्थापना करणे (०४) (०१) मुफसल (२४०८०२६२) ०१” या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. उक्त शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेस्थळावर उपलबध असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २०१९०११११६२२५६७३०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2019.01.11 16:33:39 +05'30'

**(भा.बा.पाटील)**
उप सचिव, महारारष्ट्र शासन.

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव.
३) मा.मंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद.
५) मा.राज्यमंत्री अनापुवग्रास यांचे खाजगी सचिव.
६) मा.अध्यक्ष, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई.
७) सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य.
८) अ.मु.स.(वित्त विभाग) यांचे स्वीय सहायक.
९) प्रधान सचिव, (अ.ना.पु.व .सग्रा.सं.वि.) यांचे स्वीय सहायक.
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र ½ मुंबई,/नागपूर.
११) वित्तीय सल्लागार व उप सचिव कार्यालय, मुंबई.
१२) प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग, मुंबई
१३) श्री.विजय चंद्रलाल प्रेमचंदानी, अध्यक्ष, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच.
१४) संबंधित जिल्हा कोषागार कार्यालय,
१५) निवडनस्ती, ग्रासं-४.